भा.प्र.से. परिविक्षाधिन अधिकारी-
२०२२ या तुकडी अंतर्गत १३
अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी
पदे निर्माण करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः पदनि-२०२३/प्र. क्र.८३ /ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १३ जुन,२०२३.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/२/२०१६.

२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टीआरएन-१०२३/प्र.क्र.१२७/२०२३/दहा, दि.०३/०५/२०२३.

**शासन निर्णय:-**

सन २०२२ च्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवेमधील १३ अधिका-यांचे लाल बहादुर शास्त्री राष्ट्रीय प्रशासन अकादमी, मसुरी येथील फेझ-१ चे प्रशिक्षण दि. १२.०५.२०२३ (म. नं.) रोजी संपुष्टात आले आहे. सदर प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर हे अधिकारी त्यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणाकरिता राज्य शासनाकडे रुजू होत आहेत. सदरहू १३ भारतीय प्रशासन सेवेमधील अधिका-यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणासाठी सहाय्यक जिल्हाधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या जिल्ह्यात पदस्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुषंगाने सदर १३ भारतीय प्रशासन सेवेमधील अधिका-यांसाठी खाली नमुद केलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयांच्या आस्थापनेवर खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी पद निर्माण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

| अ . .क्र | परिविक्षाधीन भा.प्र.से. अधिकाऱ्याचे नाव | जिल्हा प्रशिक्षणासाठी प्रस्तावित जिल्हा | परिविक्षाधीन कालावधी |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती प्रियंवदा अशोक म्हाडदळकर | उस्मानबाद | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| २ | श्री. अर्पित चौहान | जळगाव | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ३ | श्री. नमन गोयल | लातूर | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ४ | श्री. नावंदर अनय नितीन | भंडारा | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ५ | श्रीमती जैसमिन | रत्नागिरी | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ६ | श्री. अकुनुरी नरेश | अमरावती | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ७ | श्री. अमित रंजन | सांगली | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ८ | श्रीमती अंजली शर्मा | नंदुरबार | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| ९ | श्रीमती अपूर्वा बासुर | वाशिम | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| १० | श्री. पवार ओमकार मधुकर | गडचिरोली | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | श्री. दोन्तुला जेनित चन्द्रा | सातारा | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| १२ | श्री. विशाल दिनानाथ खत्री | सिंधुदुर्ग | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |
| १३ | श्री. यादव रणजित मोहन | चंद्रपूर | दि.२९.०८.२०२२ - दि.२८.०८.२४ |

२. शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. सदर अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांच्या पदावर होणारा खर्च " मागणी क्र. सी-१-२०५३ -जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना आस्थापना (०१) (०१)आयुक्त कोकण (२०५३ ००२८), (०१)(०२) आयुक्त नाशिक (२०५३ ००४६),(०१)(०३) आयुक्त, पुणे (२०५३ ००६४), (०१)(०४) आयुक्त अमरावती (२०५३ ००८२), (०१)(०५) आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८), (०१)(०६) आयुक्त औरंगाबाद (२०५३ ०१२६) बाब क्र. ०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२४१२०७०४३११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by DR.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=DR.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.07.24 13:24:48 +05'30'

**( डॉ.श्वेता सावदेकर-बेग )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ अमरावती व नागपूर.
२) जिल्हाधिकारी,उस्मानाबाद/जळगाव/लातूर/भंडारा/रत्नागिरी/अमरावती/सांगली /नंदुरबार/वाशिम/सातारा/गडचिरोली/सिंधुदुर्ग/चंद्रपूर.
३) जिल्हा कोषागार अधिकारी , उस्मानाबाद/जळगाव/लातूर भंडारा/रत्नागिरी/अमरावती/ सांगली/नंदुरबार/वाशिम/सातारा/गडचिरोली/सिंधुदुर्ग/चंद्रपूर.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई /नागपूर.
५) उप सचिव, कार्यासन १०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) उप सचिव/ सह सचिव (कार्यासन ब-१ / ई-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८.